नव्याने नियुक्त होणा-या गट अ, गट ब, व गट क मधील शासकीय अधिकारी / कर्मचा-यांसाठी संगणक ज्ञान विषयक नियुक्तीपूर्व अर्हतेची अट शिथिल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र. ६१/ २००१/३९

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १९ मार्च, २००३.

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र ६१/२००१/३९ दिनांक ७ ऑगस्ट, २००१.

२) सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र. ५/२००१/३९, दिनांक २० जुलै, २००२.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये, शासन सेवेतील गट अ, गट ब व गट क या पदावर नियुक्तीकरिता हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान ही एक अतिरिक्त आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आलेली आहे. सदर तरतुदींच्या आधारे शासनाने दिनांक ७ ऑगस्ट, २००१ च्या शासन निर्णयानुसार नव्याने नियुक्तीसाठी अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत 'C.C.C.' किंवा 'O' स्तर 'A' स्तर किंवा 'B' किंवा 'C' स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाण पत्र यापैकी एक, संगणक ज्ञानाची अतिरिक्त अर्हता निश्चित केली आहे. तथापि शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, संगणक ज्ञानाची अतिरिक्त अर्हता नियुक्तीपूर्वी प्राप्त करणे राज्यातील ग्रामीण भागातील विशेषतः दुर्गम भागातील उमेदवारांकरिता अडचणीचे आहे. याचा विचार करता सदर अर्हता नियुक्तीपूर्वी प्राप्त करण्याच्या तरतूदीस सवलत देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेस अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

दिनांक १९.३.२००३ रोजी किंवा त्यानंतर गट अ, गट ब व गट क मधील (वाहन चालक वगळून) ज्या पदांची निवड प्रक्रिया सुरु होईल अशा नव्याने नियुक्त होणा-या सर्व अधिकारी / कर्मचा-यांनी संगणक अर्हता त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत प्राप्त करणे आवश्यक राहील अन्यथा त्यांच्या सेवा समाप्त होतील. अशा प्रकारची अट अशा उमेदवारांच्या नियुक्ती पत्रात घालण्यात यावी.

शासन निर्णय दिनांक २० जुलै, २००२ मधील परिच्छेद ४ मधील तरतुदीनुसार शासन सेवेत असलेल्या अधिकारी / कर्मचा-यांना परीक्षेसाठी जे शुल्क आकारले जाईल त्यापोटी जास्तीत जास्त रु. ३००/- (रु. तीनशे फक्त) इतकी रक्कम देय आहे. मात्र नव्याने

नियुक्ती होणाऱ्या कर्मचाऱ्यांना / अधिकाऱ्यांना सदर रक्कम देय राहणार नाही. सदर कर्मचाऱ्यांना / अधिकाऱ्यांना संगणक अर्हता स्वखर्चाने प्राप्त करावी लागेल.

सदर शासन निर्णयाच्या तरतुदी दिनांक १९ मार्च, २००३ पासून लागू होतील. महाराष्ट्र नागरी सेवा भरती नियमात सुधारणा करण्याची प्रक्रिया स्वतंत्ररित्या करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

संगणक संकेतांक २०१००८०३१५४७०९३००१

(नितीन गद्रे)

सह सचिव व संचालक (माते)

प्रति
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा मुख्य सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय (विधान परिषद / विधान सभा), मुंबई,
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल - २ ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र - २, नागपूर,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव,
पोलीस महासंचालक, मुंबई,
सर्व पोलीस उप महासंचालक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगर पालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित, पहिला मजला,
व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण इमारत, ३ महानगरपालिका मार्ग, मुंबई ४०० ००१,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन वांद्रे (पू), मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती).